**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या व नियुक्त्या**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्र.एलटीएस-१११११/(३२३/२०११)/आ.(वर्ग-१)
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २०.०८.२०११

**आदेश**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सेवेच्या दृष्टीने **श्री.शि.मा.गोवंडे, का.अ.लघु पाटबंधारे(स्था.स्तर) विभाग, सांगली** यांची बदलीने नियुक्ती **का.अ.तथा अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई** या रिक्त पदावर करण्यात येत आहे. श्री.गोवंडे यांच्या बदलीने रिक्त झालेल्या का.अ.लघु पाटबंधारे(स्था.स्तर) विभाग, सांगली या पदाचा कार्यभार तात्पुरत्या स्वरुपात स्थानिक अधिका-याकडे सोपविण्यात यावा. सदर पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश वेगळयाने काढण्यात येतील.

२. संबंधित अधिका-यास कळविण्यात येते की, बदली करण्यात आलेल्या अधिका-यास आपल्या नवीन बदलीच्या पदावर हजर होण्यास कार्यमुक्त करावे. कार्यमुक्त केल्याचा दिनांक व नवीन नियुक्तीच्या पदावर सदर अधिकारी रुजू झाल्याबाबत शासनास त्वरित कळवावे.

३. संबंधित अधिका-यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिका-यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिका-यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिका-याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास संबंधित अधिका-यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच कोणत्याही प्रकारच्या दबावाबाबतची ही कृती

महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियमांचे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगाविषयक कारवाई करण्यांत येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८३०१५३७०४००१ असा आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.
महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

२०/०८/११

**(डॉ.माधव वीर)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

सचिव (जलसंपदा) / सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे, जलसंपदा विभाग
मुख्य अभियंता, ल.पा. (स्था.स्तर), पुणे
अधीक्षक अभियंता,लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ, पुणे
खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (कृष्णा खोरे पाटबंधारे मंडळ), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव , मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
संबंधित अधिकारी
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी
आ.(वर्ग-१), कार्यासन संग्रहार्थ